राज्य रक्त संक्रमण परिषदेस सन २०१४-१५ या वित्तीय वर्षातील मंजुर अनुदानातून निधी वितरीत करण्यास मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः राररसे-२०१४/प्र.क्र.१५१/आ-५,**
जी.टी.रुग्णालय आवार, कॉम्प्लेक्स बिल्डींग,
८ व १० मजला, नवीन मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
तारीख: १० सप्टेंबर, २०१४.

संदर्भ :

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांकः अर्थसं-२०.१४/प्र.क्र.६६/अर्थसंकल्प-३, दि. १७ एप्रिल, २०१४.
२) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन ज्ञापन क्रमांकः बीयुडी-२०१४/प्र.क्र.७९/अर्थसंकल्प, दि. २ एप्रिल, २०१४.
३) संचालक, आरोग्य सेवा यांचे क्रमांकःसंआसे/सहाय्यक अनुदाने-रा.र.सं.प/२०१४/४१९, दि. ५ जून, २०१४ चे पत्र.
४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांकः अंदाज-२०१४/प्र.क्र.११०/अर्थ-३, दि.१ जुलै, २०१४

**शासन निर्णय:**

राज्य रक्त संक्रमण परिषद ही शासकीय स्वायत्त संस्था असून या संस्थेचा मूळ उद्देश राज्यात सुरक्षित रक्ताचा मुबलक पुरवठा वाजवी किंमतीत व्हावा हा आहे. या परिषदेसाठी सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात रु. २०.०० कोटी इतकी तरतूद सहाय्यक अनुदान म्हणून अर्थसंकल्पीत करण्यात आली आहे. त्यापैकी रु. ५.०० कोटी इतके लेखा अनुदान माहे एप्रिल ते जुलै, २०१४ या चार महिन्यांच्या कालावधीतील खर्च भागविण्यासाठी वितरीत करण्यास विधानमंडळाने “महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) विधेयक, २०१४” अन्वये मंजुरी दिली आहे. तसेच संदर्भ क्र. ४ येथील वित्त विभागाच्या परिपत्रकत सन २०१४-१५ च्या प्रथम आठमाहीकरीता (नोव्हेंबर, २०१४ अखेर) आवश्यक असणारा योजनेत्तर व योजनांतर्गत अर्थसंकल्पीत निधी एकूण वार्षिक तरतूदीच्या ६० टक्केच्या मर्यादेत संनियंत्रण प्रणालीद्वारे (बीम्स) वितरीत केला जाणार असल्याचे कळविले आहे.

राज्य रक्त संक्रमण परिषदेमार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध लोकोपयोगी योजना, कर्मचारी वर्गाचे वेतन, रक्तपेढयांना पुरविण्यात येणाऱ्या साहित्य सामुग्रीवरील खर्च भागविण्यासाठी राज्य रक्त संक्रमण परिषदेस (२२१० ४४७३-योजनांतर्गत) सहाय्यक अनुदान (वेतनेतर) या उद्दिष्ठांतर्गत सन २०१४-१५ या वित्तीय वर्षात अर्थसंकल्पीत रु. २०.०० कोटी इतक्या तरतूदीतून पहिल्या चार महिन्यातील (माहे एप्रिल ते जुलै, २०१४) खर्च भागविण्यासाठी रु. ५.०० कोटी (अक्षरी रुपये पाच कोटी फक्त) इतके सहाय्यक अनुदान वितरीत करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदरचा खर्च खाली दर्शविलेल्या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ या वर्षासाठी मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्र. आर-१
२२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०१- नागरी आरोग्य सेवा विषम चिकित्सा
११०- रुग्णालये व दवाखाने
राज्य योजनांतर्गत योजना
(०६) (२५) रक्त संक्रमण सेवा
३१- सहाय्यक अनुदाने (२२१० ४४७३)

राज्य रक्त संक्रमण परिषदेस वितरीत अनुदानाशी संबंधीत खर्चाचे देयक अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडे सादर करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना व सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

सदर आदेश वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांचे अनौपचारिक संदर्भ क्र.२६१/व्यय-१३, दि.०३.०८.२०१४ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९१०११५३५२५५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sul Dnyandeo L

Digitally signed by Sul Dnyandeo L
DN: CN = Sul Dnyandeo L, C = IN, S = Maharashtra, O = Govt Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2014.09.11 11:34:06 +05'30'

**( ज्ञा. ल. सुळ )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा व अनुज्ञेयता) आणि (लेखा परिक्षा), मुंबई.
२. अधिदान व लेखा अधिकारी, लेखा व कोषागारे, मुंबई.
३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय,मुंबई.
५. संचालक, राज्य रक्त संक्रमण परिषद, मुंबई.

६. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
७. प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
८. नियोजन विभाग (का.१४७२), मंत्रालय, मुंबई.
९. वित्त विभाग (अर्थसंकल्प), (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
१०. सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प शाखा), (लेखा शाखा), मंत्रालय, मुंबई.
११. निवडनस्ती (आरोग्य-५)